**<u>सर्वोच्च प्राथम्य</u>**

**सन २०१०-२०११ ची जिल्हा वार्षिक आदिवासी**
**<u>उपयोजना तयार करणे....</u>**
**मार्गदर्शक तत्वे व कालबध्द कार्यक्रम...**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक :- टिएसपी-२००९/प्र.क्र.१८८/का.६**
**मंत्रालय, विस्तार, मुंबई - ४०० ०३२**
**दिनांक :- २८ जानेवारी,२०१०.**

वाचा : १) आ.वि.वि.शासन निर्णय क्र.टिएसपी २००८/प्र.क्र.६/का.६, दि.१६ डिसेंबर,२००९.
२) नियोजन विभाग, शासन परिपत्रक क्र.जिवायो १००९/प्र.क्र.२१०/का-१४८१, दि.३० ऑक्टोंबर,२००९.

**<u>परिपत्रक</u>** : शासन निर्णय, दिनांक २१.९.१९९२ अन्वये आदिवासी उपयोजना तयार करण्याच्या व राबविण्याच्या कार्यपध्दतीमध्ये शासनाने १९९३-९४ पासून धोरणात्मक बदल केले असून, त्यानुसार राज्याची आदिवासी उपयोजना तयार करण्याची पूर्णत: जबाबदारी आदिवासी विकास विभागाकडे दिलेली आहे. यात अंशिक बदल करण्यात आले असून आता विभागाच्या दिनांक १६ डिसेंबर, २००९ च्या शासन निर्णयानुसार जिल्हा वार्षिक योजना तयार करण्याची जबाबदारी त्या त्या जिल्हयाच्या जिल्हाधिकारी यांच्याकडे सोपविण्यात आलेली आहे. त्यानुसार सन २०१०-२०११ च्या वार्षिक आदिवासी उपयोजनेतंर्गत जिल्हा वार्षिक योजना तयार करण्यासाठी खालीलप्रमाणे मार्गदर्शक सुचना प्रसारित करण्यात येत आहेत.

२. आदिवासी उपयोजना ही वार्षिक योजनेचा एक भाग असून आदिवासी उपयोजना तयार करण्याचा कार्यक्रम हा वार्षिक योजनेच्या कार्यक्रमाशी पूरक आहे. २०१०-२०११ च्या जिल्हा वार्षिक आदिवासी उपयोजनेचे प्रारुप आराखडे संबंधित प्रकल्प अधिकारी यांनी जिल्हाधिका-यांशी चर्चा करुन करावे व तयार आदिवासी उपयोजना समितीची मान्यता घेऊन जिल्हा नियोजन समिततीमध्ये मान्यतेसाठी सादर करावे.

३. प्रकल्प अधिकाऱ्यांनी जिल्हयाचा आराखडा तयार करीत असतांना खालील मार्गदर्शक तत्वांचे काटेकोरपणे पालन करावे.

(क) यासोबत जोडलेल्या तक्त्याप्रमाणे (परिशिष्ट अ ) आदिवासी उपयोजना व आदिवासी उपयोजना बाहेरील क्षेत्र जिल्हयासाठी (TSP+OTSP) करिता दर्शविलेल्या निधीच्या आधीन राहून वार्षिक आराखडा तयार करण्यात यावे.

(ख) यासोबत जोडलेल्या परिशिष्ट "क" प्रमाणे क्षेत्रनिहाय (Sectorwise) प्राप्त निधीचे आवंटन/वाटप विभिन्न विभागामध्ये करण्यात यावे.

(ग) क्षेत्रातील विभागांच्या मागिल तीन वर्षात झालेल्या खर्चोची सरासरी काढण्यात यावी व त्याप्रमाणे क्षेत्रातील विभागांना निधीचे नियतव्यय आवंटित करावे.

(घ) विभागातील वाटप केलेल्या निधीची विभागणी त्या विभागाच्या मुख्य शिर्षातील त्यामध्ये निधीवाटप ३ वर्षात झालेल्या खर्चेच्या सरासरी घेऊन त्या प्रमाणात करावी.

(ड) शीर्षनिहाय प्राप्त निधीची विभागणी ६५ टक्के, सद्या सुरु असलेल्या अपूर्ण कामावर व ३५ टक्के निधीत नवीन कामे घेण्यात यावी. विभागणी शीर्षनिहाय शक्य नसल्यास योजनानिहाय यावा.

(च) नवीन कामांसाठी अर्थसंकल्पीत तरतूदीपेक्षा दुप्पट रकमेपर्यंत नवीन कामे विभागाने घ्यावीत. नवीन कामे घेतांना जी गांवे रस्त्यांनी जोडलेली नाहीत किंवा ज्या गांवांचे विद्युतीकरण झालेले नाही अशा गावांना व कामांना प्राधान्य द्यावे.

(क्ष) आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेरील योजनेखाली निधीची तालुक्यात विभागणी स्थानिक क्षेत्रानुसार करावी. व ती तरतूद आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेरील शिर्षामध्ये दर्शविलेली तरतूदीतून करण्यात यावे.

(ज) आदिवासी उप क्षेत्रातील प्रकल्प घेण्यासाठी सर्व प्रकल्पाचे कार्यक्षेत्र पूर्णरित्या आदिवासी उपयोजनेमध्ये आहे किंवा कसे याबाबत जिल्हाधिकारी यांनी स्वतः खात्री करावी. आदिवासी उपयोजना क्षेत्राकरिता केलेली तरतूद आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेरील योजनेमध्ये खर्च करता येणार नाही याची काळजी संबंधित जिल्हाधिकारी यांनी घ्यावी.

(झ) संबंधित विभाग प्रमुखांनी कामे आदिवासी उपयोजना क्षेत्रातील आहेत याबाबतचे प्रमाणपत्र प्रशासकीय मान्यतेच्यावेळी स्वतःच्या स्वाक्षरीने अंदाजपत्रकासोबत जोडावे व जिल्हाधिकारी यांनी प्रशासकीय मान्यता देतांना असे प्रमाणपत्र असल्याशिवाय प्रशासकीय मान्यता देऊ नये.

(त्र) आदिवासी उपयोजना क्षेत्रासाठी उपलब्ध करुन दिलेला नियतव्यय बिगर आदिवासी क्षेत्रावर खर्च झाल्यास त्याची सर्वस्वी जबाबदारी विभागप्रमुख व जिल्हाधिकारी यांची राहिल व याबाबत विभागप्रमुख यांच्यावर कडक प्रशासकीय कारवाई करण्यात येईल.

(ट) विविध योजनांच्या संदर्भात प्रकल्प अधिकाऱ्यांनी त्यांच्या प्रकल्प क्षेत्रात दौरे करुन क्षेत्रीय पातळीवरील अंमलबजावणी अधिकाऱ्यांशी चर्चा करावी व त्यानुसार आदिवासी क्षेत्रातील नेमकी गरज लक्षात घ्यावी व नेमक्या कोणत्या योजना घेण्याची आवश्यकता आहे, हे निश्चित करावे. असे करताना ज्या भागात सदर योजना राबवावयाची असेल त्या भागातील मोठया संख्येने लाभार्थ्यांना लाभ मिळेल, अशा कामांना सर्वप्राथम्य द्यावे व त्यांची गरज भागविल्यानंतर त्यापेक्षा कमी लोकसंख्येला लाभदायी ठरणाऱ्या योजनांनाच अग्रक्रम द्यावा.

४. राज्याची वार्षिक योजना तयार करतांना वैधानिक विकास मंडळाचा सहभाग घ्यावयाचा आहे. म्हणून २०१०-२०११ आदिवासी उपयोजना तयार करण्यामध्ये वैधानिक विकास मंडळांना सहभागी करुन घेण्यासाठी शासनाने वार्षिक आदिवासी उपयोजना नियोजन समितीवर संबंधित वैधानिक विकास मंडळाच्या एका सदस्याची नियुक्ती केली आहे.

५. २०१०-२०११ च्या जिल्हा वार्षिक आदिवासी उपयोजनासाठी जिल्हावार/ प्रकल्पनिहाय कमाल आर्थिक मर्यादा सोबतच्या **परिशिष्ट-अ** मध्ये देण्यात आली आहे. सन २०१०-२०११ च्या **राज्य योजनेचे आकारमान अजून निश्चित न झाल्यामुळे या आर्थिक मर्यादा तात्पुरत्या स्वरुपाच्या आहेत. तथापि जिल्हास्तरीय योजनांकरीता एकुण रु.१०६८००.०० लाख नियतव्यय तुर्त प्रस्तावित करण्यात येत आहे.** जिल्हा योजनांची जेव्हा राज्यस्तरावर चर्चा होईल त्यावेळी जिल्हा योजनांना अंतिम स्वरुप देण्यात येईल.

६. २०१०-२०११ ची जिल्हा वार्षिक आदिवासी उपयोजना ही शासनाने दिलेल्या नव्या मार्गदर्शक तत्वानुसार तयार करावयाची आहे. अंदाज समितीने त्यांच्या चौदाव्या अहवालातील शिफारशीला अनुलक्षून विधान सभा सदस्यांना त्यांच्या मतदारसंघातील कोणत्या कामासाठी किती तरतूद करण्यात आली याची माहिती मिळावी या हेतूने प्रत्येक योजनेसाठी प्रस्तावित केलेल्या एकूण नियतव्ययाची **विगतवारी प्रकल्प क्षेत्रातंर्गत विकास गटनिहाय/तालुकानिहाय स्वतंत्रपणे दाखविण्यात यावी.**

७. जिल्हा वार्षिक आदिवासी उपयोजना तयार करतांना **परिशिष्ट-क** मधील मार्गदर्शक तत्वे तसेच शासनाच्या नियोजन विभागाच्या दिनांक ३० ऑक्टोंबर, २००९ नुसार दिलेल्या सर्वसाधारण सूचना विचारात घ्याव्यात.

८. जिल्हा वार्षिक आदिवासी उपयोजना या **परिशिष्ट-अ** मध्ये दिलेल्या कमाल नियतव्ययाच्या मर्यादेत असावी. ज्या जिल्हयामध्ये एकापेक्षा अधिक प्रकल्प कार्यालये आहेत त्यांचेसाठी प्रकल्पनिहाय वाटप **परिशिष्ट-ब** मध्ये देण्यात आलेले आहे.

९. जिल्हा वार्षिक योजनेत प्रस्तावित केलेल्या नियतव्ययाची विकासक्षेत्र/ उपक्षेत्र /योजना/ प्रकल्प निहाय, तालूकावार विगतवारी जिल्हा आदिवासी उपयोजना जिल्हा नियोजन समितीच्या सदस्यांना बैठकीपूर्वी उपलबध करुन देण्यात यावी.

१०. २०१०-२०११ च्या जिल्हा वार्षिक योजनेस राज्यस्तरावर अंतिम स्वरुप देण्यासाठी प्रत्येक जिल्हयाची आवश्यक असलेली माहिती विहित प्रपत्रामध्ये प्राप्त व्हावी म्हणून **१ ते ५ विवरणपत्रे** विहित केलेली आहेत.

११. आदिवासी उपयोजनेची आखणी व अंमलबजावणी प्रभावीपणे करण्यासाठी प्रत्येक जिल्हयासाठी खालील बाबींचा समावेश असलेली स्वयंस्पष्ठ टिप्पणी प्रस्तावांच्या छाननी दरम्यान अंमलबजावणी अधिका-याच्या मदतीने तयार करुन ठेवावी.

(१) जिल्हयामधील रस्त्यांची लांबी
(२) रस्त्याने न जोडलेली गावे/वाड्या/पाडे/आश्रमशाळा/प्राथमिक आरोग्य केंद्र इत्यादी
(३) विद्युतीकरण न झालेली गावे
(४) लघुपाटबंधारे (कोल्हापूर पध्दतीच्या बांधा-यास) प्रकल्पाची माहिती
   (अ) प्रकल्पाचे नाव
   (ब) प्रकल्प पूर्ण झाल्याचे वर्ष अंदाजित खर्च
   (क) सुरु असलेल्या नवीन प्रकल्पाची प्रशासकीय मान्यतेनुसार किंमत व आतापर्यंतच्या खर्च व अपेक्षित खर्च.
   (ड) नव्याने सुरु करावयाचे लघुपाटबंधारे प्रकल्प
(५) वैद्यकीय उपलब्ध सुविधा व अनुशेष असल्यास त्याची माहिती.
(६) पाणीपुरवठा योजनेबाबतची सविस्तर माहिती व जे गांव, पाडे/वाडीत अजूनही स्वच्छ पीणेची पाण्याची सोय नाही त्यांना प्राधान्य दयावे.
(७) चालू वर्षी आतापर्यंत आदिवासी उपयोजनेतून सदर जिल्हयामध्ये झालेला खर्च
(८) अंमलबजावणी अधिका-यांच्या काही अडचणी / नवीन प्रस्ताव असल्यास त्याचा तपशिल
(९) शासकीय / अनुदानीत आश्रमशाळा / वसतीगृहे / शालेय शिक्षण विभागामार्फत चालविण्यात येणा-या शाळा इ. ची सांख्यिकी माहिती.
(१०) विशेष केंद्रीय सहाय्य आणि भारतीय संविधानाच्या अनुच्छेद २७५(१) अंतर्गत व आदिम जमातीच्या विकासासाठी केंद्रिय क्षेत्र योजना (PTG) राबविण्यात आलेल्या /येणा-या योजनांबाबतची सांख्यिकी माहिती.
(११) सन २००८-०९ मध्ये झालेल्या खर्चाचा विहित नमुन्यात तपशील.

वरील मुद्दे उदाहरणादाखल आहेत. त्यामध्ये आणखी काही उपयुक्त माहितीचा समावेश करणे आवश्यकता वाटल्यास समावेश करण्यात यावा.

१२. सर्व संबंधितांना असे सूचित करण्यात येते की, वर उल्लेखिलेल्या मार्गदर्शक सूचना लक्षात घेऊन जिल्हयांच्या योजनाबाबतच्या आराखडा तयार करण्यात यावा. आदिवासी उपयोजनेचा आराखडा केंद्र शासनाकडे /योजना आयोगाकडे पाठवावयाचा असल्यामूळे याबाबत तातडीने कार्यवाही पूर्ण करावी. आदिवासी उपयोजनेंतर्गत मागासवर्गीयांचे कल्याण या शिर्षाखाली जिल्हा वार्षिक योजना तयार करण्याची जबाबदारी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांचेवर राहिल तसेच आदिवासी उपयोजनेंतर्गत इतर विकास शिर्षाची जिल्हा वार्षिक योजना तयार करण्याची जबाबदारी जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव यांच्यावर राहिल. कोणत्याही परिस्थितीत जिल्हा आदिवासी उपयोजना नियोजन समितीने संमत केलेल्या **जिल्हा योजनेच्या प्रस्तावाच्या १० प्रती आदिवासी विकास विभागाकडे व नियोजन विभागाकडे दिनांक १५.०२.२०१० पर्यत पाठवाव्यात. तसेच संबंधित मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना सुध्दा त्याचवेळेस प्रती पाठविण्याची व्यवस्था करावी.**

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**( भ. प्र. सिंह )**
**सह सचिव**

**सहपत्र :- जोडपत्र**

**प्रति,**
सर्व जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समित्या.

**प्रत सादर अग्रेषित.**

मा.राज्यपालांचे सचिव,राजभवन,मलबार हिल,मुंबई

मा.मुख्यमंत्र्याचे सचिव / मा.उप मुख्यमंत्र्याचे सचिव

मा.मंत्री (आ.वि.) यांचे खाजगी सचिव / मा.राज्यमंत्री (आ.वि.) यांचे खाजगी सचिव

मा.सर्व मंत्री /राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव

मा.मुख्य सचिव

सर्व अपर मुख्य सचिव/सर्व प्रधान सचिव/सचिव मंत्रालयीन विभाग

प्रधान सचिव(नियोजन विभाग)मंत्रालय,मुंबई.

सर्व मंत्रालयीन विभाग,मंत्रालय,मुंबई

अपर आयुक्त व सदस्य सचिव,विदर्भ वैधानिक विकास मंडळ,बी-२३/ए,साउथ अंबाझरी मार्ग,अंध विद्यालयाजवळ,नागपूर

सदस्य सचिव,मराठवाडा वैधानिक विकास मंडळ, नविन प्रशासकीय इमारत, जिल्हाधिकारी कार्यालय कंपाऊड, तळमजला,औरंगाबाद-४३१००१

सदस्य सचिव,उर्वरित महाराष्ट्र वैद्यानिक विकास मंडळ, नविन प्रशासकीय इमारत, १८,वा मजला, (पश्चिम बाजू) मंत्रालयासमोर,मुंबई-३२

कार्यकारी अध्यक्ष, राज्य नियोजन मंडळ, नविन प्रशासकीय इमारत, १९ वा मजला, (पश्चिम बाजू) मंत्रालयासमोर,मुंबई-३२

सर्व विभागीय आयुक्त

आयुक्त,आदिवासी विकास,नाशिक

सर्व अपर आयुक्त,आदिवासी विकास,

नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ (१५ प्रति)

सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद

सर्व विशेष कार्यकारी अधिकारी, विभागीय आयुक्तांची कार्यालये

सर्व जिलहाधिकारी कार्यालये

सर्व जिल्हा नियोजन अधिकारी

सर्व प्रशासकीय विभागाखालील विभागप्रमुख

सर्व एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प

मा.प्रधान सचिव (आ.वि.)यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.

आदिवासी विकास विभागातील सर्व सह सचिव/ उप सचिव/ अवर सचिव/ कक्ष अधिकारी,

आदिवासी विकास विभाग, मंत्रालय,मुंबई.

व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ,नाशिक

आयुक्त,आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था,पुणे

संचालक,अर्थ व सांख्यिकी संचालनालय,मुंबई.

निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

## आदिवासी उपयोजना सन २०१०-११ नियतव्यय वाटप सूत्र

**शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग/का.६, दिनांक ९ जानेवारी २००७ नुसार**

**आदिवासी उपयोजनेचा नियतव्यय जिल्हास्तर व राज्यस्तर या दोन भागात विभागला जातो.**

| सन २०१०-११ नियतव्यय वाटप रुपये १७८०००.०० लाख | | | |
|---|---|---|---|
| जिल्हास्तर | | | राज्यस्तर |
| ६० % | | | ४० % |
| रुपये १०६८००.०० लाख | | | रुपये ७१२००.०० लाख |
| जिल्हास्तरीय नियतव्ययाचे वाटप खालीलप्रमाणे दोन भागात विभागला जातो. | | | |
| टिएसपी | | ओटिएसपी | |
| ८५% | | १५% | |
| रुपये ९०७८०.०० लाख | | रुपये १६०२०.०० लाख | |
| आदिवासी लोकसंख्येवर आधारित | आदिवासी क्षेत्रावर आधारित | सर्व ३५ जिल्ह्यांना १००% आदिवासी लोकसंख्येच्या प्रमाणात नियतव्यय वाटप करणे | |
| ८०% | २०% | वरील सुत्रानुसार ओटिएसपी क्षेत्रासाठी जास्त नियतव्यय उपलब्ध होत असल्यास तो कमी करुन अतिसंवेदनशिल जिल्ह्यांना वाटप करता येतो. त्याप्रमाणे सन २०१०-११ या वर्षाकरिता रु.१०.०० कोटी नियतव्यय अक्कलकुवा धडगांव विशेष कृती कार्यक्रमास ठेवण्यात आला आहे. | |
| रुपये ७२६२४.०० लाख | रुपये १८१५६.०० लाख | | |

परिशिष्ट-अ

जिल्हा वार्षिक योजना 2010-2011 करीता जिल्हानिहाय आर्थिक कमाल मर्यादा (सीलींग)

(रुपये लाखात)

| अ.क्र. | जिल्ह्याचे नांव | टिएसपी + अे.टि.एस.पी नियतव्यय | माडा + मिनीमाडा नियतव्यय | ओ.टि.एस.पी नियतव्यय | एकूण |
|---|---|---|---|---|---|
| 1 | मुंबई शहर | 0.00 | 0.00 | 41.11 | 41.11 |
| 2 | मुंबई उपनगर | 0.00 | 0.00 | 140.15 | 140.15 |
| 3 | ठाणे | 18833.33 | 163.40 | 905.60 | 19902.33 |
| 4 | रायगड | 435.91 | 854.50 | 797.62 | 2088.04 |
| 5 | रत्नागिरी | 0.00 | 0.00 | 39.99 | 39.99 |
| 6 | सिंधुदूर्ग | 0.00 | 0.00 | 9.85 | 9.85 |
| 7 | नाशिक | 14002.10 | 490.89 | 1778.68 | 16271.67 |
| 8 | धुळे | 4118.66 | 0.00 | 869.77 | 4988.43 |
| 9 | नंदूरबार | 15646.63 | 0.00 | 276.04 | 15922.67 |
| 10 | जळगाव | 778.38 | 0.00 | 1490.47 | 2268.86 |
| 11 | अहमदनगर | 1819.76 | 108.68 | 799.68 | 2728.12 |
| 12 | पुणे | 1781.36 | 265.12 | 639.13 | 2685.60 |
| 13 | सातारा | 0.00 | 0.00 | 43.56 | 43.56 |
| 14 | सांगली | 0.00 | 0.00 | 35.52 | 35.52 |
| 15 | सोलापूर | 0.00 | 0.00 | 137.24 | 137.24 |
| 16 | कोल्हापूर | 0.00 | 0.00 | 42.55 | 42.55 |
| | उर्वरित महाराष्ट्र | 57416.13 | 1882.58 | 8046.97 | 67345.68 |
| 17 | बुलढाणा | 0.00 | 547.33 | 346.31 | 893.64 |
| 18 | अकोला | 0.00 | 489.83 | 299.21 | 789.04 |
| 19 | वाशिम | 0.00 | 416.14 | 196.23 | 612.37 |
| 20 | अमरावती | 3616.75 | 590.52 | 561.41 | 4768.68 |
| 21 | यवतमाळ | 4433.03 | 1031.43 | 943.97 | 6408.43 |
| 22 | नागपूर | 784.91 | 800.81 | 1419.05 | 3004.76 |
| 23 | वर्धा | 0.00 | 468.11 | 519.92 | 988.03 |
| 24 | भंडारा | 0.00 | 287.14 | 322.51 | 609.66 |
| 25 | गोंदिया | 2366.32 | 294.34 | 328.97 | 2989.64 |
| 26 | चंद्रपूर | 4071.67 | 910.55 | 623.04 | 5605.26 |
| 27 | गडचिरोली | 8543.99 | 0.00 | 127.94 | 8671.93 |
| | विदर्भ | 23816.67 | 5836.19 | 5688.56 | 35341.43 |
| 28 | औरंगाबाद | 0.00 | 0.00 | 199.76 | 199.76 |
| 29 | जालना | 0.00 | 0.00 | 63.86 | 63.86 |
| 30 | बीड | 0.00 | 0.00 | 48.13 | 48.13 |
| 31 | परभणी | 0.00 | 0.00 | 70.04 | 70.04 |
| 32 | हिंगोली | 0.00 | 855.84 | 90.64 | 946.48 |
| 33 | नांदेड | 1344.12 | 628.46 | 661.46 | 2634.04 |
| 34 | उस्मानाबाद | 0.00 | 0.00 | 55.42 | 55.42 |
| 35 | लातूर | 0.00 | 0.00 | 95.16 | 95.16 |
| | मराठवाडा | 1344.12 | 1484.30 | 1284.47 | 4112.89 |
| | एकूण राज्य | 82576.92 | 9203.08 | 15020.00 | 106800.00 |

परिशिष्ट-ब

**जिल्हा वार्षिक आदिवासी उपयोजना सन 2010-2011 करीता प्रकल्पनिहाय आर्थिक कमाल मर्यादा (सीलींग)**

(रुपये लाखात)

| अ.क्र. | जिल्ह्याचे नांव | एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्पाचे नांव | टिएसपी + अे.टि.एस.पी नियतव्यय | माडा + मिनीमाडा नियतव्यय | ओ.टि.एस.पी नियतव्यय | एकूण |
|---|---|---|---|---|---|---|
| 1 | ठाणे | डहाणू | 8857.56 | 0.00 | 285.78 | 9143.34 |
| | | जव्हार | 6640.81 | 0.00 | 0.00 | 6640.81 |
| | | शहापूर | 3334.97 | 163.40 | 619.82 | 4118.19 |
| | एकूण ठाणे | | 18833.33 | 163.40 | 905.60 | 19902.33 |
| 2 | नाशिक | नाशिक | 7870.66 | 356.68 | 1056.33 | 9283.67 |
| | | कळवण | 6131.44 | 134.21 | 722.35 | 6988.00 |
| | एकूण नाशिक | | 14002.10 | 490.89 | 1778.68 | 16271.67 |
| 3 | नंदुरबार | नंदुरबार | 5389.59 | 0.00 | 137.68 | 5527.27 |
| | | तळोदा | 10257.04 | 0.00 | 138.36 | 10395.40 |
| | एकूण नंदुरबार | | 15646.63 | 0.00 | 276.04 | 15922.67 |
| 4 | चंद्रपूर | चंद्रपूर | 2279.99 | 564.25 | 399.73 | 3243.98 |
| | | चिमूर | 1791.68 | 346.30 | 223.31 | 2361.29 |
| | एकूण चंद्रपूर | | 4071.67 | 910.55 | 623.04 | 5605.26 |
| 5 | गडचिरोली | अहेरी | 1605.78 | 0.00 | 1.61 | 1607.39 |
| | | भामरागड | 2422.63 | 0.00 | 0.00 | 2422.63 |
| | | गडचिरोली | 4515.58 | 0.00 | 126.33 | 4641.91 |
| | एकूण गडचिरोली | | 8543.99 | 0.00 | 127.94 | 8671.93 |

## परिशिष्ट-क

( **शासन परिपत्रक :- टिएसपी-२००९/प्र.क्र.१८८/का.६, दिनांक   जानेवारी, २०१० चे सहपत्र**)

जिल्हा वार्षिक आदिवासी उपयोजना २०१०-२०११ विकासक्षेत्र/उपक्षेत्रनिहाय तरतूदीकरीता विचारात घ्यावयाचे मुद्दे व त्याविषयीची मार्गदर्शक तत्वे.

१. ज्या जिल्हयात एकापेक्षा जास्त एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प आहेत, तेथील जिल्हयाला देण्यात आलेल्या कमाल नियतव्ययामधून जो नियतव्यय प्रकल्पासाठी निश्चित करण्यात आलेला आहे, त्या नियतव्ययामध्ये त्या प्रकल्पाची आदिवासी उपयोजना बसवावयाची आहे. तसेच जिल्हयासाठी निश्चित करुन देण्यात आलेल्या कमाल नियतव्ययाच्या मर्यादेमध्ये जिल्हयाची आदिवासी उपयोजना बसवावयाची आहे. ज्या जिल्हयात एकापेक्षा जास्त प्रकल्प क्षेत्रे आहेत तेथे सर्व प्रकल्पांची एकत्रित योजना तयार करुन ती जिल्हा आदिवासी उपयोजना नियोजन समितीकडे परिशिष्ट-अ मध्ये जिल्हयाला दिलेल्या कमाल मर्यादेच्या अधिन राहून मंजूरीकरीता सादर करावयाची आहे.

२. परिशिष्ट-अ मध्ये जिल्हयाला दिलेल्या कमाल मर्यादेच्या अधिन राहून तरतूद करावयाची आहे.

३. शासन निर्णय दिनांक २२.६.९५ अन्वये शासनाने आदिवासी क्षेत्रात नवसंजिवन योजना सुरु केली आहे. त्या योजनेखाली अंतर्भूत असलेल्या सर्व घटक योजनांसाठी/कार्यक्रमासाठी भरीव नियतव्यय उपलब्ध करुन घेण्यात यावा. विशेषत: मागासवर्गीयांचे कल्याण, आरोग्य, पाणीपुरवठा, विद्युत विकास इ. उपविकास क्षेत्रासाठी पुरेशी तरतूद केली जाईल याची दक्षता आदिवासी उपयोजना नियोजन समितीने घ्यावी.

४. वीस कलमी कार्यक्रम/किमान गरजा कार्यक्रम, इ. कार्यक्रमांसाठी पुरेशी तरतूद करण्यात यावी. त्याचप्रमाणे केंद्रशासन पुरस्कृत जिल्हा स्तरावरील योजनांसाठी राज्य शासनाच्या हिश्श्याची तरतूद कटाक्षाने करण्यात यावी.

५. आदिवासी उपयोजनेचा खर्चामध्ये फसवी वाढ दर्शविणाऱ्या परंतू प्रत्यक्ष आदिवासींना विशेष लाभ न देणाऱ्या अशा केवळ टक्केवारीवर आधारीत काल्पनिक तरतूदी ( नोशनल) निक्षून वगळण्यात याव्यात असे शासनाचे धोरण आहे. त्या धोरणाचा पाठपुरावा म्हणून उर्जा क्षेत्रातील उच्च दाबाच्या पारेषण वाहिन्या टाकणे, राष्ट्रीय व राज्य महामार्ग इ. कार्यक्रमांसाठी जिल्हा वार्षिक आदिवासी उपयोजनेमध्ये तरतूदी करण्यात येऊ नयेत. तथापि, आदिवासी क्षेत्रातील अशा प्रकारच्या कामांना/योजनांना जिल्हयाच्या सर्वसाधारण योजनेमधून आवश्यक तेवढया तरतूदी उपलब्ध करुन घेण्याचे प्रयत्न करण्यात यावेत. आदिवासी उपयोजना प्रारुप आराखडा तयार करताना तेथील स्थानिक गरजा लक्षात घेवून प्रारुप आराखडा तयार करण्यात यावा.

६. ज्या जिल्हयात आदिम जमातीच्या लोकांची वस्ती आहे, अशा जिल्हयात उदा. ठाणे व रायगड जिल्हा (कातकरी), गडचिरोली जिल्हा ( माडीया गोंड), यवतमाळ व नांदेड जिल्हा ( कोलाम) या जिल्हयातील आदिवासी उपयोजना नियोजन समितीने या आदिम जमातीच्या जलद विकासाकरीता वैयक्तिक अथवा कौटुंबिक लाभाच्या योजनांची तसेच मुलभूत विकासाच्या योजनांची आखणी करुन त्याकरीता शासनाने ठरवून दिलेल्या टक्केवारीनुसार व

त्यांच्या लोकसंख्येच्या प्रमाणात अग्रक्रमाने आवश्यक व्यय जिल्हा आदिवासी उपयोजनेत उपलब्ध करुन द्यावा. यासंदर्भात शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र.टिएसपी-२००३/प्र.क्र.८५/का.६, दिनांक १६ जानेवारी २००४ मधील परिच्छेद क्रमांक ४ मध्ये दिलेल्या सुचनांचे पालन करावे

७. पारधी जमातीच्या विकासाकरीता, त्यांची जिल्हयातील लोकसंख्या विचारात घेवून त्या प्रमाणात त्यांच्या विकासासाठी असलेल्या कार्यक्रमासाठी आवश्यक तरतूद प्राधान्याने आदिवासी उपयोजनेमध्ये समाविष्ठ करावी. त्याचप्रमाणे आदिम जमातीकरीता केलेल्या तरतुदीची योजनावार माहिती एका परिशिष्टात स्वतंत्ररित्या जोडून आदिवासी उपयोजनेच्या आराखडयाबरोबर शासनाला सादर करावी.

८. जिल्हा आदिवासी उपयोजना तयार करतांना आदिवासी उपयोजना क्षेत्र (अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रासह) आणि माडा व मिनीमाडा क्षेत्र असलेले क्षेत्र वगळून उरलेल्या भागातील आदिवासींसाठी (ओटिएसपी) वैयक्तीक व कौटुंबिक लाभाच्या योजनेकरीता निश्चित अशी तरतूद संबंधित विकास क्षेत्राखाली स्वतंत्रपणे दाखविण्यात यावी. ज्या जिल्हयात आदिवासी उपयोजना क्षेत्र आणि माडा व मिनीमाडा क्षेत्र नसेल त्या जिल्हयामध्ये सुध्दा ओटिएसपी करीता आवश्यक तेवढया प्रमाणात तरतूदी कराव्यात.

९. आदिवासी उपयोजनेमध्ये माडा आणि मिनीमाडा क्षेत्रासाठी मुलभूत सोयी उपलब्ध करुन देण्यासाठी नियतव्यय उपलब्ध करुन देण्यात येतो. तसेच ओटिएसपी ही संकल्पना आदिवासी उपयोजनेचाच एक भाग राहील. परंतू ओटिएसपी क्षेत्रातील खर्चाबाबतचे वेगळे अहवाल केंद्र शासनाला सादर करावे लागतात. म्हणून माडा व मिनीमाडा क्षेत्रातील मूलभूत सोयी व वैयक्तिक लाभाच्या योजनांसाठी उपलब्ध करुन दिलेला नियतव्यय हा ओटिएसपी या संकल्पनेत समाविष्ट करुन तसा दाखविण्यात यावा.

१०. नागपूर, भंडारा व चंद्रपूर या जिल्हयांमध्ये अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रात असलेली काही गांवे माडा क्षेत्रात आलेली आहेत तर काही गांवे दोन्हीकडे दाखविण्यात आलेली आहेत. अशा गांवांसाठी असलेल्या मुलभूत सुविधांकरीता व तेथील वैयक्तिक लाभांच्या योजनांकरीता हव्या असलेल्या तरतूदी या "टिएसपी" खाली दाखविण्यात याव्यात. अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रासाठी गावांसाठी करावयाची तरतूद ही "टिएसपी" खालील समाविष्ट करण्यात यावी. परंतू जी अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रातील गांवे माडा क्षेत्रामध्ये दाखविण्यात आलेली आहेत, त्या गांवांच्या संदर्भात करावयाच्या तरतूदी या "माडा" साठी वर्गीकृत केलेल्या तरतूदीमध्ये समाविष्ट करण्यात याव्यात या सूचना लक्षात घेवून संबंधित जिल्हा आदिवासी उपयोजना नियोजन समित्यांनी आदिवासी उपयोजनेचा आराखडा तयार करावयाचा आहे.

११. जिल्हयाला आदिवासी उपयोजनेखाली उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीपैकी त्या जिल्हयातील दुर्गम भागांसाठी जास्तीत जास्त निधी उपलब्ध व्हावा, या हेतूने असे कळविण्यात येते की, सदर जिल्हयातील इतर सर्वसाधारण आदिवासी भागाला जो निधी देय होईल, त्या निधीपेक्षा जास्त टक्केवारीने अतिदुर्गम भागासाठी नियतव्यय देण्यात यावा. उदा. नंदूरबार जिल्हयातील नंदूरबार प्रकल्प क्षेत्रात एकूण ६ तालुके असून त्यापैकी अक्कलकुवा व

अक्राणी या दोन तालुक्यामध्ये अतिदुर्गम क्षेत्राचा समावेश आहे. म्हणून नंदूरबार प्रकल्पांतर्गत जर १०० रुपये नियतव्यय द्यावयाचा असेल तर तो प्रत्येकी १५% प्रमाणे ६ तालुक्यांना देय होईल व उर्वरित १०% हा उपरोक्त दोन अतिदुर्गम तालुक्याला समप्रमाणात वाढवून देण्यात यावा. अशा रितीने प्राप्त होणाऱ्या नियतव्ययामधून अतिदुर्गम क्षेत्रासाठी जोडरस्ते व इतर पायाभूत सुविधा देण्याकरिता आवश्यक ती तरतूद प्राथम्यक्रमाने करावी.

१२. शासनाला असे आढळून आले आहे की, काही अत्यंत महत्वाच्या योजनांचा समावेश योग्य वेळी जिल्हा आदिवासी उपयोजनेत न केल्यामूळे अशा योजना राबविण्यासाठी काही विचार न करता घाईघाईने न्युक्लीअस बजेट योजनेखाली प्रस्तावित करण्यात येतात. उदा. आदिवासी वस्त्या/पाडे इ. मध्ये पाणी पुरवठा करणे, पिण्याच्या पाण्याची सोय करणे, वस्तीशाळा सुरु करणे, अनेक प्रकारच्या प्रशिक्षण योजना सुरु करणे, इ. वास्तविक अशा पायाभूत कारणासाठी/समुहविकासासाठी घ्यावयाच्या योजना आवश्यक आहेत. तेव्हा जिल्हा वार्षिक आदिवासी उपयोजनेत अशा योजनांचा समावेश करण्यात यावा. असे केल्यास न्यूक्लीयस बजेट योजनेवर अनावश्यक भार पडणार नाही.

१३. केंद्र पुरस्कृत योजना, केंद्र सहाय्यित योजना तसेच रोजगारावर आधारित केंद्र शासनाकडून अर्थसहाय्य प्राप्त होणाऱ्या योजना उदा.स्वर्णजयंती स्वयंरोजगार योजना, जवाहर रोजगार योजना इ. करिता अंमलबजावणी अधिकाऱ्यांकडून/प्रशासकीय विभागाकडून जेवढया निधीची मागणी होईल (केवळ राज्य हिस्सा) तेवढा निधी संबंधित जिल्हयाकरिता जिल्हयाच्या कमाल आर्थिक मर्यादेमधून पूर्णपणे (१००%) उपलब्ध करुन देण्यात यावा.

१४. सन २००९-२०१० या आर्थिक वर्षात आदिवासी उपयोजना तयार करताना शासनाने विकास क्षेत्र/उपविकास क्षेत्रनिहाय टक्केवारीचे आदेश दि. ९ जानेवारी २००७ च्या शासन निर्णयान्वये निर्गमित केलेले आहेत. त्यानुसार सन २०१०-११ आदिवासी उपयोजना प्रारुप आराखडा तयार करताना उपविकास क्षेत्रनिहाय नियतव्ययाच्या टक्केवारीचा तपशील पुढीलप्रमाणे आहे :

| अ.क्र. | उप विकास क्षेत्र | राखून ठेवावयाचा नियतव्यय (टक्केवारी) |
|---|---|---|
| १ | मागासवर्गीयांचे कल्याण( आ.वि.वि.) | किमान ४० % |
| २ | विद्युत विकास (पारंपारिक व अपारंपारिक उर्जा करिता) | किमान ४ % |
| ३ | रस्ते विकास | कमाल १० % |
| ४ | लघुपाटबंधारे- | |
| | लघुपाटबंधारे - ० ते १०० हेक्टर | किमान ३ % |
| | लघुपाटबंधारे - १००हेक्टर वरील | किमान ३% |
| ५ | पशुसंवर्धन/मत्स्यव्यवसाय | कमाल १ % |
| ६ | शिक्षण (तंत्रशिक्षण व औद्योगिक प्रशिक्षण संस्थासह) | किमान ६ % |
| ७ | ग्रामीण पाणी पुरवठा | किमान ३% |
| ८ | आरोग्य | किमान १५ % |
| ९ | पोषण | किमान ३% |
| १० | मृदसंधारण | कमाल ३% |

| अ.क्र. | उप विकास क्षेत्र | राखून ठेवावयाचा नियतव्यय (टक्केवारी) |
|---|---|---|
| ११ | उर्वरित सर्व विकास शिर्षे | ३ % |
| १२ | वन व वन पर्यटन | ३ % |
| १३ | कृषि व फलोत्पादन | ३ % |

१५. (१) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्रमांक टिएसपी-२००५/ प्र.क्र.५९/का.६, दिनांक १० नोव्हेंबर, २००५ अन्वये आदिवासी उपयोजनेतून विविध विकासक्षेत्राची कामे हाती घेण्याबाबत मार्गदर्शक सुचना घालून देण्यात आल्या आहेत. त्या मार्गदर्शक सुचनांचे तंतोतंत पालन करावे.

(२) आदिवासी क्षेत्रातील रस्त्यांच्या कामामध्ये फक्त लिंकरोड म्हणजे मुख्य रस्त्यापासून गाव जोडणाऱ्या रस्त्यांचा समावेश असावा. त्यामध्ये फक्त सी.डी. वर्क्स, लहान पूल, व लहान मोऱ्या यांचा समावेश असावा.आदिवासी लोकसंख्येच्या उतरत्या क्रमानुसारची गांवे घेण्यात यावीत.रस्ते जोडण्याच्या कार्यक्रमात बारमाही रस्ते कार्यक्रमाला प्रथम प्राधान्य देण्यात यावे. शिवाय, ज्या आश्रमशाळांना/प्राथमिक आरोग्य केंद्र/उपकेंद्रांना जोडरस्ते नाहीत तेथील कामांना अग्रक्रम द्यावा. जिल्हा रस्ते, रस्त्यांचे रुंदीकरण, स्टेट हायवे इ. साठी आदिवासी उपयोजनेतून निधी देण्यात येऊ नये.

(३) रस्तेविकास उपविकास क्षेत्रासाठी ठेवण्यात आलेल्या एकूण नियतव्ययापैकी ५०% चालू कामांना, १५% सी.डी.वर्क्स, लहान पूल, मोऱ्या या कामांना, २०% नियतव्यय आदिवासी गावे/वाड्या पाडे यांना जोडणाऱ्या कामांना तर उर्वरित १५% आठमाही रस्ते बारमाही करण्यासाठीच्या कामांना ठेवण्यात यावा. आदिवासी उपयोजना क्षेत्रात मार्च-२००८ पर्यंत जिल्हानिहाय अर्थसंकल्पीत झालेल्या रस्त्यांसंदर्भात व सन २०१०-२०११ मध्ये करावयाच्या कामांचा प्राधान्यक्रम सुरुवातीस निश्चित करण्यात यावा. तसचे प्राधान्य क्रमानुसार नवीन कोणती कामे यादित घेण्यात यावयाची आहेत व त्यास लागणारा निधी याबाबत स्वतंत्र विवरणपत्र देण्यात यावे.

(४) वरील (३) मध्ये नमूद केल्याप्रमाणे सध्या चालू असलेल्या कामांपैकी ज्या कामांवर आतापर्यंत ५०% खर्च झाला आहे, अशा कामांना अग्रक्रम देण्यात यावा. जेणेकरुन हाती घेतलेले काम पूर्ण होईल.

१६. आदिवासी उपयोजनेखालील जिल्हा योजनांसाठी नियतव्यय निश्चित करताना स्टेटपूल योजनांसाठी नियतव्यय विहीत करु नये. आदिवासी उपयोजनेतील **स्टेटपूल** योजनेखालील या योजनांसाठी राज्यस्तरावर स्वतंत्रपणे निधी देण्यात येईल.

१७. आदिवासी उपयोजनेमधून १) आमदारांचा स्थानिक विकास कार्यक्रम २)डोंगरी विकास कार्यक्रम व ३) रोजगार हमी योजनेकरिता जिल्हानिहाय तरतूदी ठेवण्याची आवश्यकता नाही. त्यामुळे या कार्यक्रमासाठी नियतव्यय देण्यात येऊ नये. यासाठीचा नियतव्यय सर्वसाधारण योजनेतून उपलब्ध करुन घ्यावा.

१८. शासन निर्णय,आ.वि.वि.क्रमांक-टिएसपी-२००३/प्र.क्र.९९/का.६,दिनांक २ डिसेंबर २००३ अन्वये आदिवासी उपयोजनेतील कृषी, पशुसंवर्धन, मत्सव्यवसाय, वने, सहकार, शिक्षण, आरोग्य, उद्योग, मावक (आ.वि.वि.) मावक (स.क.वि.), क्रीडा या उपक्षेत्रातील दीर्घ काल चालू असलेल्या काही योजना योजनेत्तर म्हणून घोषित करण्यात आलेल्या आहेत. या आदेशातील १) औद्योगिक प्रशिक्षण संस्थेतील मागासवर्गीय विद्यार्थ्यांना विद्यावेतन व २) व्यवसायिक महाविद्यालयाशी संलग्न असलेल्या वसतिगृहातील अनूसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना निर्वाह भत्ता देणे. या योजना वगळता उर्वरित योजनांना सन २०१०-२०११ करीता नियतव्यय ठेवण्यात येऊ नये.

१९. सन २०१०-११ मध्ये खालील योजनांसाठी आवश्यक तो नियतव्यय जिल्हास्तरावरुन उपलब्ध करुन द्यावा.

| अ.क्र. | उपक्षेत्राचे /योजनेचे नाव |
|---|---|
| | **मागासवर्गीयांचे कल्याण** |
| १ | आदिवासी मुलींची शाळेतील गळती रोखण्यासाठी अर्थसहाय्य |
| २ | आश्रमशाळेतील मुलींसाठी स्वतंत्र वसतीगृह बांधणे |
| ३ | सांस्कृतिक सभागृह बांधणे (प्रत्येक जिल्हयात दोन) |
| ४ | आदिवासींना शेतजमीन खरेदीसाठी अर्थसहाय्य (स्वाभिमान योजना) |
| ५ | ठक्कर बाप्पा वस्तीसुधारणा योजना |
| | **कामगार व कामगार कल्याण** |
| १ | औद्योगिक प्रशिक्षण संस्थेतील व्यवसायभिमुख प्रशिक्षणासाठी सार्वत्रिकरण योजना |
| | **आरोग्य** |
| १ | संवेदनशील आदिवासी क्षेत्रातील आरोग्य विषयक कार्यक्रम |

आदिवासींना शेतजमिन खरेदीसाठी अर्थसहाय्य (स्वाभीमान योजना),ठक्कर बाप्पा या योजना सन २००८-०९ पासून जिल्हास्तरीय योजना करण्यात आलेल्या आहेत. सन २०१०-११ मध्ये सदर योजनांना पुरेसा निधी उपलब्ध करुन देण्यात यावा.

२०. शिक्षण उपक्षेत्रात अनुसुचित जमातीच्या मुलींना शाळेत नियमित येण्यासाठी उपस्थिती भत्ता व मागासवर्गीयांचे कल्याण (आ.वि.वि.) अनुसुचित जमातीच्या विद्यार्थीनींची गळती थांबविण्यासाठी प्रोत्साहन भत्ता अशा दोन समान योजना राबविण्यात येत आहेत. त्यापैकी आदिवासी विभागाची योजना अधिक लाभदायक असल्यामुळे शिक्षण विभागाच्या योजनांसाठी नियतव्यय ठेवण्यात येऊ नये.

**२१. मुद्या क्रमांक १५ येथे नमूद केल्याप्रमाणे** "मागासवर्गीयांचे कल्याण" या विकासशिर्षाखाली किमान ४०% नियतव्यय राखून ठेवावयाचा आहे. त्यामधून मागासवर्गीयांचे कल्याण अंतर्गत येणाऱ्या योजनांसाठी किती नियतव्यय प्रस्तावित करण्यात यावा, याविषयी आयुक्त, आदिवासी विकास यांच्याकडून स्वतंत्र मार्गदर्शक सूचना प्रसृत केल्या जातील. त्यानुसार चालू आश्रमशाळा, शासकीय वसतिगृहे यांचे परिरक्षण व बांधकाम तसेच तेलपंप व वीजपंप इ. योजनांकरिता आवश्यक तेवढा निधी उपलब्ध करुन देण्यात यावा. त्याचप्रमाणे नवीन शासकीय आश्रमशाळा/अनुदानीत आश्रमशाळा/पोस्ट बेसिक आश्रमशाळा/कनिष्ठ महाविद्यालये/वसतिगृहे इ. मास्टर प्लॅनप्रमाणे जिल्हा अनुशेष लक्षात घेवून आवश्यक तेवढा नियतव्यय उपलब्ध करुन देण्यात यावा.

२२.	जिल्हयाला टिएसपी क्षेत्रासाठी व माडा, मिनीमाडासाठी जो नियतव्यय उपलब्ध करुन देण्यात आला आहे, त्यामधून त्या क्षेत्रात राहणाऱ्या आदिवासींच्या वैयक्तिक व कौटुंबिक लाभाच्या योजनांकरिता २०% प्रमाणे व त्या क्षेत्रातील पायाभूत सुविधा निर्माण करण्याकरिता योजनांवर ८०% या प्रमाणे शासनाच्या धोरणानुसार खर्च करावयाचा आहे. म्हणून त्या दृष्टीने आवश्यक तेवढा निधी उपलब्ध करुन देण्याची दक्षता घेण्यात यावी. याशिवाय जिल्हयातील ओटिएसपीसाठी ठरवून देण्यात आलेल्या नियतव्ययातून आदिवासींच्या फक्त वैयक्तिक अथवा कौटुंबिक लाभाच्या योजनांकरिता फलदायी व निवडक योजनांसाठी नियतव्यय दिला जाईल, याची दक्षता घेण्यात यावी.

२३.	मागास भागाच्या जलद विकासासाठी घोषित करण्यात आलेल्या विशेष कृती कार्यक्रमातील जिल्हास्तरीय योजनांसाठी आवश्यक ती तरतूद करण्यात यावी व तत्संबंधीची माहिती विशिष्ट परिशिष्टात स्वतंत्रपणे आराखडयास जोडावी.

२४.	शासनाचे महिला विषयक नवीन धोरण लक्षात घेऊन त्यांचे करीता असलेल्या सर्व योजनांकरीता आवश्यक तरतूद ठेवण्यात यावी.

२५.	नगर विकास या उपविकास क्षेत्रातंर्गत आदिवासी उपयोजनेतून ज्या नगरपालिका आदिवासी क्षेत्रात आहेत अशा नगरपालिकांना जो नियतव्यय उपलब्ध करुन देण्यात येतो त्यामधून संबधित नगरपालिकांनी शॉपिंग सेंटर/शॉपिंग मॉल किंवा तत्सम कामांकरीता नियतव्यय देण्यात येऊ नये, तर हा नियतव्यय त्या नगरपालिका क्षेत्रातील आदिवासी वस्त्यांमधील अंतर्गत रस्ते, गटारे, सांडपाण्याची व्यवस्था, वीजेची सोय, आरोग्य विषयक सोयी, शिक्षण विषयक सोयी त्याचप्रमाणे आदिवासींकडून निर्मीत वस्तुंची विपणन व्यवस्था यासह इतर प्राथमिक सुविधा इ. त्याच वस्त्यांमधील सामूहिक लाभांच्या योजनांकरीता वापरण्यात यावा.

२६.	सन २००५-०६ या वर्षापासून शासनाने योजनेवरील खर्च करताना मासिक निधी विवरणपत्रानुसार खर्च करण्याच्या सूचना दिल्या होत्या. सन २००७-०८ पासून योजना/ बाबनिहाय खर्चावर आधारित वस्तुनिष्ठ मासिक खर्च विवरणपत्र तयार करण्याच्या वित्त विभागाच्या सूचना आहेत. सबब, सर्व अंमलबजावणी अधिकाऱ्यांनी नियोजन समितीने मान्य केलेल्या योजनांवरील प्रत्यक्ष खर्चावर आधारित मासिक खर्चाचे विवरणपत्र संबंधित विभाग प्रमुख/प्रशासकीय विभागामार्फत आदिवासी विकास विभागास सादर करावे.

२७.	जिल्हयातील संवेदनशील तालुक्यांसाठी त्या त्या जिल्हयांकरिता उपलब्ध करुन देण्यात आलेल्या नियतव्ययापैकी २० % नियतव्यय बाजूला काढून तो संवेदनशीन तालुक्यांमध्ये समप्रमाणात अतिरिक्त नियतव्यय म्हणून वाटून देण्यात यावा.

******************

<u>विवरणपत्र - १</u>

**प्रारुप वार्षिक आदिवासी उपयोजना सन २०१०-११ च्या प्रस्तावित नियतव्ययाचा गोषवारा.**

**जिल्हा :-** **(रुपये लाखात)**

| अ.क्र. | क्षेत्र/उपक्षेत्र | अंमलबजावणी अधिकारी | सन २००८-०९ | | सन २००९-१० | | सन २०१०-११ | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | मंजूर नियतव्यय | मार्च, २००८ अखेरचा खर्च | मंजूर नियतव्यय | अपेक्षित खर्च | अंमलबजावणी अधिकाऱ्यांनी प्रस्तावित केलेला नियतव्यय | कमाल आर्थिक मर्यादेनुसार प्रस्तावित केलेला नियतव्यय | त्यापैकी भांडवली खर्च |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० |
| १ | पीक संवर्धन | | | | | | | | |
| २ | फलोत्पादन | | | | | | | | |
| ३ | | | | | | | | | |
| ४ | | | | | | | | | |
| **एकूण** | | | | | | | | | |

<u>**टिप**</u> **:-** १) वरील स्तंभ २ मध्ये विकास क्षेत्रांची एकूण ३९ उपक्षेत्रे घ्यावीत.

२) सन २००९-१० चा मंजूर नियतव्यय आदिवासी विकास विभागाने काढलेल्या जिल्हा वार्षिक योजनेच्या पुस्तकात दर्शविल्याप्रमाणे असावा.

३) स्तंभ ९ ची एकूण बेरीज जोडपत्र-१ मध्ये जिल्ह्यास दिलेल्या सिलिंग इतकी असावी.

# विवरणपत्र-२

## प्रारुप वार्षिक आदिवासी उपयोजना सन २०१०-११ च्या विकास क्षेत्रामधील योजना/प्रकल्प यासाठी प्रस्तावित नियतव्यय आणि भौतिक उद्दिष्टे

| अ.क्र. पुस्तिकेतील क्र. योजना क्र. | विकासक्षेत्र/ उपक्षेत्र/ योजनेचे/ प्रकल्पाचे नांव | प्रशासकीय विभाग व अंमलबजावणी अधिकारी | सन २००९-१० | | सन २०१०-११ | | | भौतिक उद्दिष्टे/साध्य | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | मंजूर नियत-व्यय | अपेक्षित खर्च (रु.लाखात) | अंमलब-जावणी अधिका-काऱ्यांनी प्रस्तावित केलेला नियतव्यय | कमाल आर्थिक मर्यादे-नुसार प्रस्तावित केलेला नियतव्यय | त्यापैकी भांडवली खर्च | बाब | परिणाम | २००९-१० | | २०१०-११ |
| | | | | | | | | | | उद्दिष्टे | साध्य | प्रस्तावित उद्दिष्टे |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ | १३ |
| | | | | | | | | | | | | |
| एकूण | | | | | | | | | | | | |

**टिप :-** १) स्तंभ २ मध्ये योजना घेताना त्या सन २००९-१० चे आदिवासी विकास विभागाने काढलेल्या पुस्तकातील क्रमानुसार घ्याव्यात. स्तंभ १ मध्ये अनु.क्र. नंतर या पुस्तकातील योजनेचा क्रमांक नमूद करावा. नवीन योजना सुचविल्या असल्यास त्या अशा योजना नंतर दाखवाव्यात. त्यांना पुस्तिकेतील क्रमांक देण्यात येणार नाहीत.

२) स्तंभ ४ ची एकूण २००९-१० च्या आदिवासी विकास विभागाने काढलेल्या पुस्तिकेत दर्शविल्याप्रमाणे नियतव्ययाची आकडेवारी असावी.

३) स्तंभ ७ ची एकूण जिल्ह्याला दिलेल्या सिलिंग इतकी असावी.

# विवरणपत्र-३

## जिल्हा नियोजन समितीच्या अखत्यारित येणाऱ्या बाह्य सहाय्यित प्रकल्पांसाठी लागणारा नियतव्यय

(रुपये लाखात)

| अ.क्र. | बाह्य सहाय्यित प्रकल्पाचे नांव | प्रकल्पाची मुदत | प्रकल्पाची एकूण अंदाजित किंमत (अलीकडील सुधारित) | एकूण मंजूर विदेशी अर्थसहाय्य | २००८-०९ पर्यंत झालेला एकूण खर्च | २००९-१० मध्ये अपेक्षित खर्च | प्रकल्पाची उर्वरित अंदाजित किंमत (४-६+७) | सन २०१०-११ साठी प्रस्तावित नियतव्यय |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ |
| | | | | | | | | |

## <u>विवरणपत्र-४</u>

### <u>जिल्हा नियोजन समितीच्या अखत्यारित येणाऱ्या केंद्र शासन पुरस्कृत योजनांसाठी लागणारा नियतव्यय</u>

**(रुपये लाखात)**

| अ.क्र. | योजनेचे नांव व केंद्र व राज्य यांच्यामध्ये खर्चाच्या हिश्श्याचे प्रमाण | सन २००८-०९ मध्ये झालेला खर्च | | | सन २००९-१० मधील मंजूर नियतव्यय | | | सन २०१०-११ साठी प्रस्तावित नियतव्यय | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | राज्य हिस्सा | केंद्र हिस्सा | एकूण | राज्य हिस्सा | केंद्र हिस्सा | एकूण | राज्य हिस्सा | केंद्र हिस्सा | एकूण |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ |
| | | | | | | | | | | |
| | एकूण | | | | | | | | | |

**<u>टिप</u> :-** १) स्तंभ २ मध्ये जिल्हा योजनेतील सर्व उपक्षेत्रातील योजना घ्याव्यात.

२) राज्य हिस्सा म्हणजे जिल्ह्याच्या योजनेतील २००९-१० बाबत मंजूर नियतव्यय व २०१०-११ साठी प्रस्तावित नियतव्यय दर्शवावा.

३) केंद्र हिस्सा नियतव्यय योजनेच्या खर्चाच्या प्रमाणानुसार दर्शवावा. सन २००८-०९ केंद्र हिश्श्याचा प्रत्यक्ष खर्च दर्शवावा.

## विवरणपत्र-५

## विदर्भ, मराठवाडा व कोकण या विभागांच्या जलद विकासासाठी कालबध्द कार्यक्रमांसाठी प्रस्तावित केलेला नियतव्यय

(रुपये लाखात)

| अ.क्र. | कार्यक्रमाचे नांव | २००८-०९ | | २००९-१० | | २०१०-११ |
|---|---|---|---|---|---|---|
| | | नियतव्यय | खर्च | नियतव्यय | खर्च | प्रस्तावित नियतव्यय |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| | | | | | | |